**सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील १२% व्याजाचे प्रदान करणेबाबत- मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.सूतगि- ३३२४/प्र.क्र.१०३/टेक्स-१ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ जून, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक बैठक-१५२१/प्र.क्र.२३/टेक्स-१(अ), दिनांक १७ नोव्हेंबर, २०२३ व शासन समक्रमांक पत्र दिनांक २४.०१.२०२४
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सूतगि- ३३२४/ प्र.क्र.१०३/ टेक्स-१ (अ), दि. २५.०३.२०२५
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५
४) आयुक्त (वस्त्रोद्योग) नागपूर यांचे पत्र क्र.: कार्या-६(१) (सूतगि)/मातोश्री र.आं.कासारवाडी /रु.५००० प्रती चाती प्रस्ताव/२२१८/२०२५, दिनांक १५.०५.२०२५

प्रस्तावना :-

शासन निर्णय दि.१७ नोव्हेंबर, २०२३ अन्वये, राज्यातील सहकारी सूत गिरण्यां सुरळीत चालाव्यात तसेच आर्थिक अडचणीतून बाहेर याव्यात याकरीता मंत्रिमंडळाच्या मान्यतेने दिनांक ११.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये लागू केलेल्या योजनेच्या धर्तीवर सहकारी सूतगिरण्यांनी वित्तीय संस्थांकडून / रा. स. वि. नि. कडून प्रतीचाती रु.५०००/- प्रमाणे ५ वर्षांसाठी घेणाऱ्या मध्यम मुदती कर्जावर (दोन वर्षाच्या मोराटोरिअम कालावधीसह) कमाल १२% पर्यंतचे व्याज प्रदान करण्याच्या योजनेस काही अटीं व शर्तींसह या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णयास अनुसरुन मातोश्री रमाबाइ आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर या सूतगिरणीने लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर या बँकेकडून प्रती चाती रु.५०००/- प्रमाणे घेतलेल्या रु.४०३.२० लक्ष कर्जावरील १२% प्रमाणे सदर सूतगिरणीस खालील प्रमाणे व्याज अदा करण्यात आलेले आहे.

| अ.क्र. | कालावधी दिनांक | शासन निर्णय दिनांक | वितरीत केलेल्या व्याजाची रक्कम रूपये |
|---|---|---|---|
| १. | दि.३०.१२.२०२३ ते दि.३१.१२.२०२४ | २५.०३.२०२५ | ४८,७८,१६१ |
| | एकूण | | ४८,७८,१६१ |

आता, सदर शासन निर्णयास अनुसरुन मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर या सूतगिरणीने लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर या बँकेकडून प्रती चाती रु.५०००/- प्रमाणे घेतलेल्या रु.४०३.२० लक्ष कर्जावरील १२% प्रमाणे दि.०१.०१.२०२५ ते दि.३१.०३.२०२५ या कालावधीसाठी रु.११,९३,०२८/- व्याजाचे प्रदान लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर या बँकेस करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

सदर सूत गिरणीने घेतलेले कर्ज हे केवळ ५ वर्ष मुदतीसाठी घेतलेले मुदत कर्ज प्रकारचे Reducing Balance Method नूसार आहे. तसेच दिनांक ११.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेल्या योजनेन्वये कर्जाची उचल केलेली नसल्याचे आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी त्यांच्या प्रस्तावात नमूद करण्यात आलेले आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दि.१७ नोव्हेंबर, २०२३ अन्वये, शासनाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन खालील तक्त्यात दर्शविलेल्या मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर या सहकारी सूतगिरणीच्या नावासमोरील स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविलेल्या बँकेला स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या व्याजाच्या रकमेचे प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **सूतगिरणीचे नाव** | **चात्यांची संख्या** | **बिनव्याजी कर्ज घेतले होते काय ? असल्यास त्याची परतफेड केली आहे का?** | **चात्यांच्या प्रमाणात कोणत्या वित्तीय संस्थेकडून / रा.स. वि. नि. कडून किती कर्ज घेतले आहे ? व व्याजाचा दर** | **१२% पर्यंतच्या व्याजाची रक्कम व व्याजाचा कालावधी** | **ज्या खात्यात व्याजाची रक्कम जमा करावयाची त्याचा तपशील** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर.** | ८,०६४ | सूतगिरणीने बिनव्याजी कर्ज घेतलेले नाही. | रु.४०३.२० लक्ष<br><br>लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर<br><br>व्याज दर - १२% | रू.११,९३,०२८/-<br><br>(दि.०१.०१.२०२५ ते दि.३१.०३.२०२५) | मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर.<br>लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, शाखा- इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर<br>Account No. 100220002001616<br><br>IFSC CODE – HDFC0CLVSB1 |
| **(रुपये अकरा लाख त्र्याणव हजार अठ्ठावीस फक्त)** | | | | **रू.११,९३,०२८/-** | |

२. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- २०४९ २५५१ या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात रु.१५००९.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२) मंजूर निधी - २०४९ २५५१ या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात रु.१५००९.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. सदर योजना ही अनिवार्य असून भारित स्वरूपाची आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे - लागू नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही - लागू नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे - लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे - लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा - लागू नाही.

८) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा - लागू नाही.

९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी - लागू नाही.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. व्ही-१, २०४९- व्याज प्रदाने, ०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज, २००-देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज (०२), इतर संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (०२) (०६) वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (अनिवार्य) (२०४९ २५५१)" भारित, ४५-व्याज" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर या सूतगिरणीने वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जावरील यापुढील कालावधीसाठी देय होणा-या व्याजप्रदानाचा तिमाही अहवाल शासनास सादर करावा.

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रू.११,९३,०२८/- (रुपये अकरा लाख त्र्याण्णव हजार अठ्ठावीस फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन उपरोक्त परिच्छेद-१ मधील तक्त्यातील स्तंभ क्र.५ मधील व्याजाची रक्कम स्तंभ क्र.६ मध्ये नमूद केलेल्या बँकेच्या खाते क्रमांकांमध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. सु. पु. पांगारकर, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री.श्रीकृष्ण पवार, उप सचिव (सूतगिरणी), (V०००९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँकेस वितरीत केल्यानंतर आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित बँकेकडून प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०७.०४.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१७१६१९३१९१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2025.06.17 16:20:08 +05'30'

**(श्रीकृष्ण पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) महालेखाकार, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-३ व १३, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) शाखा व्यवस्थापक, लक्ष्मी विष्णू सहकारी बँक लि., इचलकरंजी, शाखा- इचलकरंजी ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर.
१२) अध्यक्ष, मातोश्री रमाबाई आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी लि., कासारवाडी, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर.
१३) कार्यासन अधिकारी, (रोख शाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई (३ प्रती).
१४) निवड नस्ती (टेक्स-१ (अ) / टेक्स-१ (ब))